**गट-अ व गट-ब मधील राजपत्रित अधिकारी यांच्याबाबतीत प्रशासकीय विभाग स्तरावर निलंबन आढावा समिती गठीत करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- संकिर्ण-१०१५/प्र.क्र.२४/वि.प्र.१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :-३०/०४/ २०१५.

**वाचा :** १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.निप्रआ-११११/प्र.क्र.८६/११-अ, दि.१४ ऑक्टोबर,२०११.

२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.अभियो-१३१२/प्र.क्र.३०/पुर्नबांधित-१, दि.१२ फेब्रुवारी,२०१३.

३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.अभियो-१३१४/प्र.क्र.८६/११-अ, दि.३१ जानेवारी,२०१५.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र नागरी सेवा(शिस्त व अपिल) नियम १९७९ च्या नियम ४ मधील पोटनियम ५ च्या खंड(क) च्या परंतुकानुसार शासकीय कर्मचाऱ्यांवर फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आला असेल अशा प्रकरणांमध्ये व निलंबित गट-अ व गट-ब संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्याकरिता प्रशासकीय विभागाच्या स्तरावर समिती गठीत करण्याची बाब विचारात घेऊन वित्त विभागाचे प्रशासकीय प्रमुख या नात्याने अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली विक्रीकर कार्यालयांतर्गत विभागीय चौकशीची प्रकरणे तत्परतेने हाताळण्याच्या दृष्टीने “निलंबन आढावा समिती” गठीत करण्यात येत असून सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| १) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (वित्त)/ | : अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव/सचिव(व्यय) | : सदस्य |
| ३) अतिरिक्त पोलीस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग | : सदस्य |
| ४) उपसचिव/सहसचिव (गृह विभाग) | : सदस्य |
| ५) वित्त विभागाचे सहसचिव/उपसचिव(विक्रीकर प्रशासन) | : सदस्य सचिव |

सदर समितीने सा.प्र.वि.शा.नि.दि.३१.०१.२०१५ मधील मुद्दा क्र.५,८,९,१० मध्ये नमूद कार्यपद्धतीचा अवलंब करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०५०६१३०११७७३०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shankar Ganpati Satpute

Digitally signed by Shankar Ganpati Satpute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shankar Ganpati Satpute
Date: 2015.05.06 13:02:52 +05'30'

**( शं.ग.सातपुते )**

सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव(वित्त),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
२. विक्रीकर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई
३. सचिव(व्यय), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
४. विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई
५. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,वरळी,मुंबई
६. सह सचिव(वि.प्र.),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
७. उपसचिव/सहसचिव (गृह विभाग) ,मंत्रालय,मुंबई
८. उपसचिव,सामान्य प्रशासन विभाग/का-११-अ,मंत्रालय,मुंबई
९. कक्ष अधिकारी, विक्रीकर प्रशा-२,वित्त विभाग.
१०.निवड नस्ती.